(८)

२०११०३१०१५५१३३००१

**पिंपरी-चिंचवड महानगरपालिका महानगरपालिकेच्या परिवहन उपक्रमातील कर्मचा-यांना स्वेच्छानिवृत्ती योजना लागू करण्यास मान्यता मिळणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पीसीसी ३००६/२०९७/प्र.क्र.३९२/०६/नवि-२२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक :- १० जुलै, २००७**

**वाचा :-** **(१)** आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.पीसीएमटी/वाह/प्रशा/२/३२१/ २००६, दिनांक १३/९/२००६ व त्यासोबतचे मनपा परिवहन समिती ठराव क्र.१६६१, दिनांक १०/७/२००६ व मनपा महासभा ठराव क्र.५९०२, दिनांक २२/८/२००६

**(२)** आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.वाह/प्रशा/२/२५/२००७/ दिनांक ४/५/२००७ व त्यासोबतची "स्वेच्छा सेवानिवृत्ती योजना नियमावली"

**प्रस्तावना :--**

पिंपरी-चिंचवड परिसरातील वस्तुस्थितीची गरज लक्षात घेवून पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेतर्फे स्वतंत्र परिवहन उपक्रमाची स्थापना दि.४ मार्च,१९७४ रोजी झाली होती. पुणे परिसरातील वाढते नागरीकरण व नागरिकांना चांगली परिवहन सेवा मिळावी व प्रदुषण नियंत्रणाखाली "भुरेलाल समिती" तसेच वेळोवेळी नियुक्त केलेल्या समित्यांची शिफारस विचारात घेवून शासनाने दि.१९/४/२००७ च्या शासन निर्णयान्वये पुणे महानगरपालिका व पिंपरी-चिंचवड महानगरपालिकांच्या परिवहन उपक्रमांचे विलिनीकरण करण्यास संमती दिली आहे. पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या परिवहन उपक्रमाकडे सी.आय.आर.टी.च्या नॉर्मस पेक्षा (एका बसला ९.५ प्रमाणे) कर्मचा-यांची संख्या खूपच अधिक आहे. त्यामुळे या परिवहन उपक्रमाचा आस्थापना खर्च खूपच अधिक आहे. तसेच वैद्यकीयदृष्टया अपात्र कर्मचा-यांची संख्या दिवसेंदिवस वाढत चालली आहे. त्यामुळे देखील आस्थापना खर्चात सातत्याने वाढ होत आहे. परिवहन उपक्रमाकडील काही वैद्यकीयदृष्टया अपात्र असलेल्या व सातत्याने रजेवर राहण्याचा कर्मचा-यांची स्वेच्छानिवृत्तीची मागणी आहे. तथापि अशी योजना, तरतूद महानगरपालिकेच्या परिवहन उपक्रमाकडे नसल्याने आणि आस्थापना खर्चात कपात करण्यासाठी तसेच विलिनीकरणावेळी पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या परिवहन उपक्रमाकडील कर्मचा-यांचे प्रमाण देखील एका बस मागे ९.५ प्रमाणे या प्रमाणात ठेवण्याचा प्रयत्न करण्यासाठी परिवहन समितीने व महासभेने ठराव करुन मान्यता दिल्याप्रमाणे "स्वेच्छानिवृत्ती योजना" तयार करुन आयुक्त पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी शासनास मान्यतेसाठी सादर केली आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :--**

आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी परिवहन समिती ठराव क्रमांक १६६१, दिनांक १०/७/२००५ आणि महासभा ठराव क्रमांक ५९०, दिनांक २२/६/२००६ मध्ये पारित झाल्यानुसार पिंपरी-चिंचवड परिवहन उपक्रमाच्या कर्मचा-यासाठी "स्वेच्छा निवृत्ती योजना" तयार करुन संदर्भीय पत्रान्वये शासनास मान्यतेसाठी सादर केली आहे. सदर स्वेच्छा निवृत्ती योजनेस मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५५ मधील तरतुदीस अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर नियमावली आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी त्वरित शासन राजपत्रात प्रसिध्द करावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,**

**( सुनील कोठेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे,
(२) मा.मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मंबई ४०० ०३२
(३) प्रधान सचिव, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
(४) परिवहन महाव्यवस्थापक, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका परिवहन उपक्रम, पिंपरी, पुणे
(५) निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई